छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कारांतर्गत समित्यांचे पुर्नगठण.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः वनश्री-२०१५/प्र.क्र. २४ /फ-११

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : १८ मे, २०१५

वाचा :-

१. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. संकीर्ण-२०१४/प्र.क्र.१८८/फ-५ दिनांक ४.१२.२०१४

२. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक: एसएलएफ-२००७/प्र.क्र.१८८/ जल-१२, दिनांक ३० जून, २००८

३ शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक : एसएलएफ-२०११/प्र.क्र.४२/ जल-१२, दिनांक २७ जून, २०११

४ शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक एसएलएफ-२०१२/प्र.क्र.७६/ जल-१२, दिनांक ६ जुलै, २०१३

५. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक एसएलएफ-२०१३/प्र.क्र.९२/ जल-१२, दिनांक ३० मे, २०१४

६. प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. कक्ष-८/प्रसिध्दी प्र.क्र.२५/२९३७/१४-१५ दि. १९.१.२०१५

प्रस्तावना :-

राज्यातील सामाजिक वनीकरणाच्या वनेत्तर क्षेत्रातील वृक्षारोपण व वृक्षसंवर्धन यामध्ये उत्कृष्ट कामगिरी करणाऱ्या व्यक्ती व संस्था यांना सन्मानित करण्यासाठी सन १९८८ पासून वर नमूद केलेल्या शासन निर्णयांद्वारे दरवर्षी महाराष्ट्र शासनातर्फे महाराष्ट्र राज्य वनश्री पुरस्कार प्रदान करण्यात येतो.

संदर्भाधीन क्र. १ येथील दिनांक ४.१२.२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या प्रशासकीय नियंत्राणाखाली असलेले सामाजिक वनीकरण संचालनालय व मंत्रालयीन स्तरावरील आस्थापना महसूल व वन विभागाच्या प्रशासकीय नियंत्राणाखाली आणण्यात आली आहे.

संदर्भाधीन क्र.३ येथील दिनांक २७ जून, २०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य वनश्री पुरस्काराचे नामाभिदान बदलण्यात आले असून, **छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कार** असे सुधारीत करण्यात आले आहे.

उपरोक्त संदर्भाधीन क्र. २ येथील दिनांक ३० जून, २००८ रोजीच्या शासन निर्णयानुसार देण्यात येणाऱ्या वनश्री पुरस्कारांच्या रकमेत तसेच वृक्षमित्र पुरस्काराच्या रकमेत संदर्भाधीन क्र. ४ येथील दिनांक ६ जुलै, २०१३ च्या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे वाढ करण्यात आली असून, सदर पुरस्कारांचे सुधारीत दर सन २०११ च्या पुरस्कार वितरणापासून लागू करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

**(अ) महसूल विभाग (वृत्तस्तर) स्तरावरील संवर्गनिहाय पुरस्कार :**

| क्र. | संवर्ग | प्रथम पुरस्कार | द्वितीय पुरस्कार |
|---|---|---|---|
| १. | व्यक्ती | रु. ५०,०००/- | रु. ३०,०००/- |
| २. | ग्रामपंचायत | रु. ५०,०००/- | रु. ३०,०००/- |
| ३. | शैक्षणिक संस्था | रु. ५०,०००/- | रु. ३०,०००/- |
| ४. | सेवाभावी संस्था | रु. ५०,०००/- | रु. ३०,०००/- |
| ५. | ग्राम/विभाग/जिल्हा | रु. ५०,०००/- | रु. ३०,०००/- |

**(ब) राज्यस्तरीय संवर्गनिहाय पुरस्कार:**

| क्र. | संवर्ग | प्रथम पुरस्कार | द्वितीय पुरस्कार | तृतीय पुरस्कार |
|---|---|---|---|---|
| १. | व्यक्ती | रु. १,००,०००/- | रु. ७५,०००/- | रु. ५०,०००/- |
| २. | ग्रामपंचायत | रु. १,००,०००/- | रु. ७५,०००/- | रु. ५०,०००/- |
| ३. | शैक्षणिक संस्था | रु. १,००,०००/- | रु. ७५,०००/- | रु. ५०,०००/- |
| ४. | सेवाभावी संस्था | रु. १,००,०००/- | रु. ७५,०००/- | रु. ५०,०००/- |
| ५. | ग्राम/विभाग/जिल्हा | रु. १,००,०००/- | रु. ७५,०००/- | रु. ५०,०००/- |

उपरोक्त संदर्भाधीन क्र.५ येथील दिनांक ३० मे, २०१४ रोजीच्या शासन निर्णयानुसार प्रचलित पध्दतीनुसार सन २०१२ साठीचे छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कार प्रदान करण्यात आलेले आहेत.

उपरोक्त संदर्भाधीन क्र. ६ येथील पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी प्रस्तावित केल्यानुसार संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयानुसार सामाजिक वनीकरण विभाग महसूल व वन विभागाच्या प्रशासकीय नियंत्राणाखाली दिनांक १ जानेवारी, २०१५ पासून आणण्यात आला आहे. छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कार-२०१३ साठी प्राप्त प्रस्तावांची छाननी करणेसाठी व प्रचलित छाननी समितीत बदल करुन नव्याने समिती गठीत करण्याची तसेच प्रस्तावांची संवर्गनिहाय व वृत्तनिहाय छाननी करुन गुणानुक्रम निश्चित करुन राज्यस्तरीय मूल्यमापन समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

राज्यातील सामाजिक वनीकरणाच्या वनेत्तर क्षेत्रातील वृक्षारोपण व वृक्षसंवर्धन यामध्ये उत्कृष्ट कामगिरी करणाऱ्या व्यक्ती व संस्था यांना सन्मानीत करण्यासाठी सन १९८८ पासून वर नमूद केलेल्या शासन निर्णयांद्वारे दरवर्षी महाराष्ट्र शासनातर्फे छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कार प्रदान करण्यात येतो. आता पुरस्कारासाठी प्रस्ताव निवडण्याच्या कार्यपध्दतीत उपरोक्त संदर्भ क्र. ७ येथील पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार सुधारणा करण्यात येत आहे.

**<u>पुरस्कारासाठी प्रस्ताव निवडण्याची कार्यपध्दती</u>** :- वरील सर्व संवर्गातील पुरस्कारासाठी संबंधित व्यक्ती/संस्था यांच्याकडून प्राप्त झालेले प्रस्ताव यापूर्वीच्या वरील संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयामधील कार्यपध्दतीनुसार त्या त्या जिल्हयाच्या उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग यांच्यामार्फत वृत्तस्तरावर प्राप्त होतील. सदर प्राप्त प्रस्तावांची संवर्गनिहाय प्राथमिक छाननी संचालनालयाचे स्तरावर खाली नमुद **“प्राथमिक समितीद्वारे”** करण्यात येईल.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व अपर महासंचालक,<br>सामाजिक वनीकरण संचालनालय,<br>महाराष्ट्र राज्य, पुणे | - | अध्यक्ष |
| २) | प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक,<br>सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे<br>यांनी निमंत्रित केलेले १ मुख्य वनसंरक्षक<br>व उपमहासंचालक | - | सदस्य |
| ३) | प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक,<br>सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे<br>यांनी निमंत्रित केलेले २ उपसंचालक,<br>सामाजिक वनीकरण विभाग | - | सदस्य |
| ४) | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे | - | सदस्य |
| ५) | उपसंचालक (रोपवाटिका),<br>सामाजिक वनीकरण संचालनालय, म.रा.,पुणे | - | सदस्य सचिव |

संदर्भ क्रमांक- २ अन्वये स्थापन केलेल्या समितीची पुर्नगठणा करुन पुढीलप्रमाणे राज्यस्तरीय मूल्यमापन समिती स्थापना करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | मा. मंत्री (वने) | - | अध्यक्ष |
| २) | मा. राज्यमंत्री (वने) | - | उपाध्यक्ष |
| ३) | सचिव (वने) | - | सदस्य |
| ४) | प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक,<br>सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे | - | सदस्य |
| ५) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थ, नियोजन व विकास)<br>महाराष्ट्र राज्य, नागपूर | - | सदस्य |
| ६) | सह / उप सचिव (वने) | - | सदस्य सचिव |

वर नमूद प्राथमिक समितीद्वारे वृत्तनिहाय प्रत्येक प्रवर्गातील प्रस्तावांवर गुणवत्ताक्रम निश्चित केला जाईल आणि अहवाल शासनास पाठविण्यात येईल. त्यानंतर राज्यस्तरीय समितीमार्फत पुरस्कार अंतीम करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१८१८१६४२७४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.05.18 18:22:16 +05'30'

**द.ल. थोरात**
सह सचिव,(वने) महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. सर्व मंत्री /मा. राज्यमंत्री
५. मा. सर्व विधानसभा सदस्य / विधान परिषद सदस्य
६. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
७. मा. राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
८. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
९. मा. सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. मा. सचिव (जलसंधारण), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
११. मा. प्रधान सचिव (ग्राम विकास), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. मा. प्रधान सचिव (पर्यावरण), पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. मा. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
१४. प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१६. मुख्य वनसंरक्षक व उपमहासंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त, ठाणे / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती /नागपूर
१७. सर्व मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य
१८. सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग
१९. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र, मुंबई

२०. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा) - १, महाराष्ट्र, मुंबई
२१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र, नागपूर
२२. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २, महाराष्ट्र, नागपूर
२३. सर्व विभागीय आयुक्त (महसूल विभाग)
२४. सर्व जिल्हाधिकारी
२५. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२६. सह सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२७. प्रसिद्धी अधिकारी, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
२८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३०. कार्यासन अधिकारी, व्यय-१५ / अर्थ-१७, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३१. सर्व संवर्गातील पुरस्कारप्राप्त संबंधितांना
३२. महसूल व वन विभाग (वन विभागातील सर्व कार्यासने)
३३. निवड नस्ती/कार्यासन- फ-११